सैनिक सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद येथे प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांच्या भोजन व्यवस्थेसाठी शासनातर्फे प्रत्येक विद्यार्थ्यांमागे देण्यात येणाऱ्या भोजन आकारातील सवलती बाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीआय-२०१३/(प्र.क्र.३४२/१३)/२८**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : ११ डिसेंबर, २०१४.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांक : एसपीआय-१०८१/३७१८/सीआर-६६/८२/२८, दि. २८/०९/१९८४ व समक्रमांकाचे दिनांक १०/०४/१९८५ व दिनांक २९/०४/१९८५ ची शुध्दीपत्रके.
२) शासन निर्णय क्रमांक : सैसेस-१०८८/१४५२/प्र.क्र.७२/८८/२८, दि. ०५/०१/१९९०.
३) शासन निर्णय क्रमांक : सैसेस-१०८८/१४५२/प्र.क्र.२५८/९१/२८, दि. ०७/०१/१९९२.
४) शासन निर्णय क्रमांक : सैसेस-१०९४/२४५१/प्र.क्र.११४/९४/२८, दि. १५/१२/१९९४.
५) शासन निर्णय क्रमांक : सैसेस-१०९७/१४५८/प्र.क्र.१०३/९७/२८, दि. ०२/०९/१९९७.
६) शासन निर्णय क्रमांक : एसपीआय-१०९८/२९४२/प्र.क्र.२४९/२०००/२८,दि. २२/०५/२०००.
७) शासन निर्णय क्रमांक : एसपीआय-२००१/२९४२/प्र.क्र.२४९/२००१/२८, दि.२०/०७/२००२.
८) शासन निर्णय क्रमांक : एसपीआय-२०१३/(प्र.क्र.३४२/१३)/२८, दि. ०१/०७/२०१४.
९) शासन निर्णय क्रमांक : एसपीआय-२००७/२५११/प्र.क्र.२०९/२००७/२८,दि. ०५/१२/२००८.
१०) शासन निर्णय क्रमांकः प्रभारी संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांचे पत्र क्र. २०१२/एसपीआय-२/२३, दिनांक ३०/०४/२०१३.

**प्रस्तावना :**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत इयत्ता ११ वी व १२ वी अशा दोन शैक्षिणक वर्षात छात्रांना राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनी, पुणे (NDA) करीता प्रशिक्षीत करण्यात येते. दोन्ही शैक्षणिक वर्षात त्यांच्या नियमित अभ्यासक्रमाव्यतिरिक्त UPSC परिक्षा व SSB मुलाखत तसेच विविध मैदानी खेळ यांचे प्रशिक्षण देण्यात येते. त्यामुळे त्यांना सकस आहार मिळणे आवश्यक आहे. वरील अभ्यासक्रमासाठी इयत्ता ११ वी साठी ५० छात्र व इयत्ता १२ वी साठी ५० छात्र असे मिळून एकूण १०० छात्रांची क्षमता आहे.

महागाईचा ग्राहक किंमतीचा निर्देशांक दिवसें दिवस वाढतच असल्यामुळे छात्रांच्या भोजनाकरीता उपलब्ध होणारे दरमहा रु.१५००/- तसेच शासनाकडून दरमहा रु.७००/- असे एकूण रु.२२००/- इतक्या रकमेत सकस आहार पुरविणे अशक्यप्राय झालेले आहे. त्यामुळे संदर्भाधिन दिनांक ०१/०७/२०१४ च्या शासन निर्णयान्वये या संस्थेत प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या भोजन व निवास

व्यवस्थेसाठी त्यांच्याकडून रुपये २०००/- इतकी रक्कम आकारण्यात येत आहे. वाढत्या महागाईच्या पार्श्वभूमीवर शासनातर्फेही प्रत्येक विद्यार्थ्यामागे, सदरहू संस्थेस देण्यात येणाऱ्या भोजन आकारातील सवलतीमध्ये वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय-**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेस शासनातर्फे प्रत्येक विद्यार्थ्यामागे देण्यात येणारी भोजन आकारातील सवलत दरमहा रूपये ७००/- (रुपये सातशे फक्त) इतकी होती, ती रुपये ३००/- ने वाढवून एकूण रुपये १०००/- (रुपये एक हजार फक्त) इतकी देण्यात यावी. सदर सवलत ही, छात्रांना देण्यात येणारे भोजन हे सोबतच्या परिशिष्ट "अ" मधील नियम व अटी यांच्या तसेच परिशिष्ट "ब" मध्ये विहित केल्यानुसार चौरस आहार/नाश्ता पुरविण्याबाबतच्या पूर्ततेच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. शासनातर्फे प्रत्येक विद्यार्थ्यामागे देण्यात येणाऱ्या भोजन आकारातील सवलतीवर दरमहा एकूण रुपये १०००/- (रुपये एक हजार फक्त) प्रमाणे खर्च मागणी क्र. ए-५, "लेखाशीर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, २०० इतर कार्यक्रम (००) (५) सेवापूर्व अध्ययन संस्था (२२३५ ००७१), ३४-शिष्यवृत्या/विद्यावेतने" याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं-१०४९/१४/व्यय-४, दिनांक ०८/१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१११६०९४२९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Pandurang Musale

Digitally signed by Sanjay Pandurang Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Pandurang Musale
Date: 2014.12.11 16:19:06 +05'30'

**(सं.पां. मुसळे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक ,
४. सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल (लेखा व आुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई - ३२,
८. कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी,
११. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
१२. संचालक, संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको, एन-१२, सेक्टर, औरंगाबाद-४३१ ००३,
१३. संचालक, सैनिक कल्याण विभाग, "रायगड"राष्ट्रीय युध्दस्मारका समो, घोरपडी, पुणे-४११ ००१,
१४. सर्व कोषागार अधिकारी,
१५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१७. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासान भवन, मुंबई ३२,
१८. महासंचालक, माहिती व जानसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
१९. वित्त विभाग (व्यय ४), अर्थ-१३ मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२०. शालेय शिक्षण विभाग (माध्यमिक शिक्षण-५), मंत्रालय, मुंबई-३२.
२१. सामान्य प्रशासन विभाग (कार्या २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२२. निवड नस्ती (२ प्रती).

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसपीआय-२०१३/(प्र.क्र.३४२/४२)/२८, दिनांक ११/१२/२०१४ चे सहपत्र)

## जोडपत्र : परिशिष्ट "अ"

१) संस्थेमार्फत विद्यार्थ्यांना पुरविण्यात येणाऱ्या भोजनाचा दर्जा सातत्याने राखण्यात यावा व तो उत्तम दर्जाच्या असावा.

२) सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत प्रवेश घेण्यात येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या इयत्ता ११ वी साठी ५० व इयत्ता १२ वी साठी ५० असे एकूण १०० विद्यार्थ्यींची प्रवेश क्षमता आहे. तथापी, प्रत्यक्ष उपस्थित विद्यार्थी संख्येच्या अनुषंगाने भोजन दराची सवलत संचालकांनी निश्चित करावी. त्याबाबतचा अहवाल शासनास अवगत करावा.

३) स्वयंपाक घरातील काम करणाऱ्या सर्व कामगारांची वैद्यकीय तपासणी करुन वैद्यकीयदृष्टया पात्रतेचा दाखला घेण्याची जबाबदारी संचालकांची राहील.

४) संचालकांच्या पुर्व परवानगीशिवाय बाहय भोजनार्थीची भोजन व्यवस्था करुन नये.

५) विद्यार्थ्यांना पुरेसे, योग्य, स्वच्छ व उत्तम दर्जाचे अन्न पदार्थ देऊन, भोजन व्यवस्था कायम चोख ठेवावी. विद्यार्थ्यांना वेळेत भोजन, चहा, व नाश्ता पुरविण्याची जबाबदारी संस्थेची राहील. तसेच साप्ताहिक भोजन मेनू आराखड्यानुसार जेवण देणे बंधनकारक राहील. सदर आराखड्यामध्ये बदल करावयाचे असल्यास संचालकांची पूर्व परवानगी घेणे बंधनकारक राहील.

६) विद्यार्थ्यांना दिला जाणारा आहार भोजन अराखडयानुसार देण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत विद्यार्थ्यांना अनारोग्य उत्पन्न करणारा नाश्ता/शिळे जेवण देण्यात येऊ नये.

७) भोजन कक्ष, स्वयंपाक गृह स्वच्छ, निटनेटके व आरोग्यदायी ठेवण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

------------

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसपीआय-२०१३/(प्र.क्र.३४२/१३)/२८, दिनांक ११/१२/२०१४ चे सहपत्र)

**जोडपत्र : परिशिष्ट "ब"**

**सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांच्याकडून विद्यार्थ्यांना खालील नमूद केल्याप्रमाणे चौरस आहार/नाश्ता पुरवठा करणे अनिवार्य राहील.**

| वार/वेळ | ०७:००-०७:३० | १३:००-१३:३० | १७:००-१७:१५ | २०:३०-२१:०० |
|---|---|---|---|---|
| सोमवार | दूध बोर्नविटा, बन पाव, पोहे | पोळी, मटकी, डाळ, भात | चहा, अंडी, फळं | पोळी, भाजी, डाळ, भात, लोणचे, व खीर. |
| मंगळवार | दूध बोर्नविटा, ब्रेड जाम, बन पाव. | पोळी, भाजी, डाळ, भात | चहा, अंडी, फळं | पोळी, छोले, भात, सलाड व पापडा. |
| बुधवार | दूध बोर्नविटा, बन पाव, उपमा. | पोळी, चवळी, डाळ, भात | चहा, अंडी, फळं | पोळी, चिकन करी, मटार पनीर, डाळ भात व लोणचे. |
| गुरुवार | दूध बोर्नविटा, बन पाव, मॅगी नुडल्स. | पोळी, भाजी, डाळ, भात | चहा, अंडी, फळं | पोळी, भाजी, डाळ, भात, सलाड. |
| शुक्रवार | दूध बोर्नविटा, ब्रेड जाम, बन पाव. | पोळी, भाजी, डाळ, भात | चहा, अंडी, फळं | पोळी, मिक्स भाजी, डाळ, भात, अंडा भुर्जी व लोणचे. |
| शनिवार | दूध बोर्नविटा, पोहे, बन पाव. | पोळी, कढी, पकौडा, भात | चहा, अंडी, फळं | पोळी, डाळफ्राय, भात व सलाड कस्टर्ड. |
| रविवार | कॉफी, वडा पाव/ इडली/ब्रेड पकोडा/ साबुदानावडा (०८:००-०८:३०) | पोळी,चिकन करी, मटार पनीर, डाळ, भात व लोणचे | मुलांना आऊट पास असल्याने नाश्ता देण्यात येत नाही. | पुलाव/मसाला भात, दही व स्वीट. |

--------------------